**जैविक विविधता अधिनियम, २००२ मधील तरतूदीच्या अंमलबजावणीसाठी स्थापित जिल्हास्तरीय समितीमधील समन्वय अधिकारी यांची कर्तव्ये.**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन परिपत्रक क्रमांक:- डब्ल्यूएलपी ०८१८/प्र.क्र.३१२/फ-१**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक :- १४ सप्टेंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र जैविक विविधता नियम, २००८ मधील नियम २३ (१) अंतर्गत जिल्हास्तरीय सनियंत्रण समितीची स्थापना करावयाची असून त्या समितीमध्ये जिल्हाधिकारी हे अध्यक्ष असून उप वनसंरक्षक (प्रादेशिक) हे वनक्षेत्राकरिता समन्वयक व वनेत्तर क्षेत्राकरिता कृषी अधिक्षक यांची सदस्य म्हणून निवड केलेली आहे. सदर समितींनी वरील नमूद नियम २३ (८) नुसार समुचित स्तरावरील जैविक विविधता व्यवस्थापन समितीला सहाय्य करायची आहे.

वरील बाब लक्षात घेता, जिल्हा स्तरावर इतर विभागांशी समन्वय करणे, जिल्हा परिषद स्तरावर झालेल्या कामाचा आढावा घेणे व ग्रामीण स्तरावर स्थानिक स्वराज्य संस्थेच्या अधिकारी, कर्मचारी, पदाधिकारी व इतर उपभोक्ता यांची क्षमता बांधणी व जनजागृती अभियान राबविण्याकरिता जिल्हास्तरीय सनियंत्रण समितीचे समन्वय अधिकारी (Nodal Officer) यांची कर्तव्ये निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**समन्वय अधिकारी यांची कर्तव्ये :-**

१) स्थानिक स्वराज्य संस्थेद्वारे जैव विविधता कायदा, २००२ मधील कलम ४१ (१) व महाराष्ट्र जैविक विविधता नियम, २००८ मधील नियम २३ (२) अंतर्गत, स्थापन करण्यात येत असलेल्या जैविक विविधता व्यवस्थापन समितीच्या कामकाजाचा आढावा, संबंधीत यंत्रणेशी सल्लामसलत करून घेणे.

२) जैविक विविधता व्यवस्थापन समितीद्वारे लोक जैवविविधता नोंदवहीचे दस्ताऐवज तयार करतांना संबंधीत स्वयंसेवी संस्था / स्थानिक स्वराज्य संस्था / शैक्षणिक संस्था / अधिकारी / विषय तज्ञ यांचेशी समन्वय साधून सहाय्य करणे.

३) लोक जैवविविधता नोंदवही तयार करण्याकरिता जिल्हा परिषदस्तरावर तांत्रिक सहाय्य गटाची स्थापना करणे बंधनकारक आहे. तेव्हा जिल्हा परिषदस्तरावर तांत्रिक सहाय्य गट स्थापन करण्याचे दृष्टीने जिल्हा परिषदेशी संपर्क साधणे व तांत्रिक सहाय्य गट स्थापन करण्याकरिता मदत करणे.

४) लोक जैवविविधता नोंदवहीमध्ये, विविध विभागांशी संबंधीत माहितीचा समावेश आहे. तेव्हा सर्व विभागाच्या माहितीचा समावेश लोक जैवविविधता नोंदवहीत होईल, या दृष्टीने जिल्हा स्तरावरील इतर विभागाचे अधिकारी, पदाधिकारी, स्वयंसेवी संस्था, शैक्षणिक संस्था, विषय तज्ञ यांचेशी संपर्क साधणे व लोक जैवविविधता नोंदवहीतील माहिती सर्वसमावेशक असेल याबाबत खात्री करणे.

५) ग्रामीणस्तरावर समिती स्थापन करणे, लोक जैवविविधता नोंदवही तयार करणे व कायद्याची अंमलबजावणी करण्याकरिता जनजागृती अभियान व क्षमता बांधणी करण्याचे दृष्टीने आवश्यक कार्यवाही करणे.

६) जैविक संसाधनाचा शाश्वत वापर करण्याकरिता योजना आराखडा तयार करण्याकरिता सहाय्य करणे.

७) स्थानिक स्वराज्य संस्थास्तरावर लोक जैवविविधता नोंदवही तयार झाल्यानंतर जैविक संसाधनाचा शाश्वत वापर करण्याकरिता विकास आराखडा राबवितांना सहाय्य करणे.

वरील कर्तव्य उप वनसंरक्षक (प्रादेशिक) हे समन्वयक अधिकारी म्हणून सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य जैव विविधता मंडळ यांचे सल्लयाने व त्यांचे निर्देशानुसार त्यांना जैव विविधता अधिनियम, २००२ ची प्रभावी अंमलबजावणी होण्यास मदत होईल या दृष्टीने करतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८०९१५१२१२३२८६१९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Deshbhratar

Digitally signed by Swapnil Deshbhratar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, cn=Swapnil Deshbhratar
Date: 2018.09.15 12:16:36 +05'30'

**( स्वप्निल देशभ्रतार )**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग.

**प्रति, माहिती व उचित कार्यवाहीसाठी :-**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे अपर मुख्य सचिव.
२. मा.मंत्री (वने), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (महसूल), मंत्रालय, मुंबई.
८. सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. महासंचालक, माहिती व प्रसिध्दी महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१०.प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
११.प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१२.सदस्य सचिव, महाराष्ट्र जैव विविधता मंडळ, नागपूर.
१३.अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई/ पूर्व नागपूर
१४.मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), सर्व
१५.मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पुणे

१६.उप वनसंरक्षक (प्रादेशिक), सर्व

१७.वनसंरक्षक व क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर,

१८. उपवनसंरक्षक (वन्यजीव),

१९.महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई / नागपूर

२०.वन कक्षातील सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

२१.निवड नस्ती, फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.